राजा राममोहन रॉय ग्रंथालय प्रतिष्ठान, कोलकाता समान निधी योजनें अंतर्गत असलेले राज्य शासनाचे अंशदान वाढविणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक -मराग्रं-२०१८/प्र.क्र. १३९/२०१८/साशि-५,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०२ फेब्रुवारी, २०१९

वाचा : १) शासन निर्णय,उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र. मराग्र २००९/(२९५/०९) साशि-५, दि.०९.०८.२०१०.
२) ग्रंथालय संचालनालयाचे पत्र क्र.३१ /अंशदान वाढ/२०१८-१९/६६७३, दि.२५.०७.२०१८.

प्रस्तावना :-

केंद्र शासनाच्या संस्कृति मंत्रालयांतर्गत येणाऱ्या राजा राममोहन राय ग्रंथालय प्रतिष्ठान, कोलकाता यांचेमार्फ़त ग्रंथालय चळवळीला उत्तेजन देण्यासाठी व सार्वजनिक ग्रंथालयांच्या सर्वांगीण विकासासाठी समान निधी योजना राबविण्यात येते. सदर योजनेसाठी महाराष्ट्र शासनाचे अशंदान प्रतिष्ठानाच्या अंशदानाएवढेच (५०: ५०) असते. संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये राज्य शासनाचे अंशदान रु. १.५० कोटी वरुन रु. २.५० कोटी पर्यंत वाढविण्यात आले असून तेवढेच प्रतिष्ठानचे अंशदान आहे. आता राजा राममोहन राय ग्रंथालय प्रतिष्ठानच्या, समान निधी योजनेअंतर्गत राज्य शासनाचे अंशदानात रु २.५० कोटी वरुन रु. ३.०० कोटी पर्यंत वाढ करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय: -**

राजा राममोहन राय ग्रंथालय प्रतिष्ठान, कोलकाताच्या समान निधी योजनेसाठी सद्यस्थितीत राज्य शासनाचे रु २.५० कोटी इतके असलेले अंशदान वाढवून ते सन २०१८-१९ पासून रु. ३.०० कोटी इतके करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरचा खर्च “मागणी क्रमांक डब्ल्यू-४, २२०५-कला व संस्कृती, १०५, सार्वजनिक ग्रंथालये, (०३) मध्यवर्ती जिल्हा व तालुका ग्रंथालयांना सहाय्य, (०३) (०२) राजा राममोहन राय ग्रंथालय प्रतिष्ठानासाठी अंशदान (अनिवार्य) (२२०५ ०३०४) ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखालील तरतुदीमधून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१९/व्यय-५, दि.०५.०१.२०१९ अन्वये प्राप्त मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१९०२०२११४९१०५४०८ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Anil Vithalrao Saware

Digitally signed by Anil Vithalrao Saware
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher And Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=073348b7a8767f0f7865422df1e65ce2f3bcdf6786e4712e2c088a9ac4ffee3f, cn=Anil Vithalrao Saware
Date: 2019.02.02 11:50:43 +05'30'

**(अनिल वि.सावरे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल-१ (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर
२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/नागपूर
३. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
४. महासंचालक, राजा राममोहन राय ग्रंथालय प्रतिष्ठान, कोलकाता
५. ग्रंथालय संचालक,ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नगर भवन, मुंबई.
६. ग्रंथपाल, राज्य मध्यवर्ती ग्रंथालय,मुंबई. (ग्रंथालय संचालनालयांमार्फत)
७. सचिव (उ.व.तं.शि.) यांचे स्वीय सहाय्यक
८. अवर सचिव,व्यय-५,वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. कक्ष अधिकारी, साशि-१, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. निवडनस्ती,साशि-५, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.